रिट याचिका क्रमांक ७८६६/२००५ व इतर याचिका- अहमदनगर जिल्ह्यातील तालुका फळरोपवाटिका, पुणतांबा, ता.राहता येथील ४ रोजंदारी मजुरांना न्यायालयीन निर्णयानुसार मजूरीतील फरकाची रक्कम अदा करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग
शासन निर्णय क्रमांकः न्यायप्र-२०१४/प्र.क्र.८१/१३-अे
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय , मुंबई ४०० ०३२
दिनांक: ७ मार्च, २०१७

वाचा:-१) मा. कामगार न्यायालय, अहमदनगर यांचा दि. १५/१२/२००४ चा न्यायनिर्णय.
२) मा. उच्च न्यायालय मुंबई,खंडपिठ औरंगाबाद यांचा दि. २१/२/२०१४ चा न्यायनिर्णय.
३) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्रमांक कृआ/१०१४/न्या.प्र./आयडीए क्र. ९६४ ते ९६८ व इतर/ रि.पि.७८६६/२००५/ व इतर ३७/प्र.क्र.४०/आस्था-४/७५१/१५ दि. १३/०८/२०१५.

**प्रस्तावना :-**

तालुका फळरोपवाटिका, पुणतांबा, ता.राहता येथील ४ रोजंदारी मजुरांना मा.कामगार न्यायालय (१) अहमदनगर येथे समान कामास समान वेतन प्रथम नियुक्तीपासुन १/२६ दराने वेतनातील फरक इ. मागणीसाठी तक्रार अर्ज दाखल केले होते.सदर प्रकरणी संदर्भ क्रमांक १ येथील मा. कामगार न्यायालय (१) अहमदनगर यांनी दि. १५/१२/२००४ च्या निर्णयान्वये तक्रार अर्जामध्ये निर्देशित केलेल्या परिशिष्टातील विवरणपत्रातील रक्कम प्रत्येक अर्जदारास प्रतिवादी यांनी न्यायानिर्णयाच्या दिनांकापासून दोन महिन्याच्या आंत अदा करावे अन्यथा सदर रकमेवर १२ टक्के वार्षिक व्याजदराने व्याज अदा करावे असे आदेश दिलेले होते. मा. कामगार न्यायालयाच्या निर्णयाविरोधात शासनाच्या वतीने मा. उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे तालुका फळरोपवाटिकेरील रोजंदारी मजूर यांच्या प्रकरणी रिट याचिका क्र. ७८६६/२००५ व इतर याचिका दाखल करण्यात आलेल्या होत्या. सदर प्रकरणी मा. उच्च न्यायालयाने संदर्भ क्र. २ येथील दि. २१/२/२०१४ रोजीच्या निर्णयान्वये याचिका खारीज केल्या. व मा. कामगार न्यायालयाचा दि.१५/१२/२००४ चा निर्णय कायम केला. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशाविरुध्द मा. सर्वोच्च न्यायालयात अपील दाखल करणे योग्य होणार नसल्याचे विधि व न्याय विभागाने अभिप्राय दिलेले आहेत. त्यामुळे मा. उच्च न्यायालयाने दिलेल्या दि. २१/२/२०१४ च्या निर्णयानुसार मा. कामगार न्यायालय अहमदनगर यांनी दि. १५/१२/२००४ च्या निर्णयान्वये आदेशित केल्यानुसार कार्यवाही करणे आवश्यक आहे. त्यानुसार उक्त रोजंदारी मजुरांना संदर्भ क्र. ३ येथील कृषि आयुक्तालयाच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार रक्कम अदा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

तालुका फळरोपवाटिका, पुणतांबा, ता.राहता येथील ४ रोजंदारी मजुरांना मा.उच्च न्यायालयाने दिलेल्या दि. २१/२/२०१४ रोजीच्या न्यायनिर्णयानुसार मा. कामगार न्यायालय अहमदनगर यांनी दि. १५/१२/२००४ च्या निर्णयान्वये आदेशित केल्यानुसार देय रक्कम रु. २,१५,०००/- व दिनांक १५/१२/२००४ ते दिनांक ३१/१२/२०१४ या कालावधीपर्यंत १२ टक्के व्याज दराने देय असलेली एकुण रक्कम २,५९,१८०/- अशी एकूण ४,७४,१८०/- इतकी रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे. त्याबाबतचा तपशिल खालील प्रमाणे

| अ.क्र. | मजूराचे नांव | मुळ IDA NO. | मुळ याचिकेचा क्र. | देय रक्कम |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. अशोक तानाजी थोरात | ९६४/९९ | ७८७०/२००५ | १,२१,३०२/- |
| २ | श्रीमती. सुशिला भिकाजी बोडखे | ९६५/९९ | ७८६९/२००५ | १,२१,३०२/- |
| ३ | श्रीमती.सुलोचना कचरु ढंगारे | ९६६/९९ | ७८८८/२००५ | ९९,२४७/- |
| ४ | श्रीमती.शांताबाई अशोक देठे | ९६७/९९ | ७८७१/२००५ | १,३२,३२९/- |
| एकूण रक्कम | | | | ४,७४,१८०/- |

सदर प्रकरणी फरकाच्या रकमेची परिगणना मा.न्यायालयाच्या आदेशानुसार बरोबर असल्याची खात्री जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर व कृषि आयुक्तालयाने करण्याच्या अटीवर सदरची मान्यता देण्यात येत आहे. हा खर्च खालील नमूद केलेल्या लेखाशिर्षामधून सन २०१६-१७ या चालू आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

लेखाशिर्ष :-
२४०१-पिक संवर्धन
मागणी क्रमांक :- डी-३,
११९-बागायती व भाजीपाला पिके,
११९( ०३) रोपमळे,(०३)(०१)
भाजीपाला रोपमळे,फळरोपमळे व स्थानक उदयाने-
(२४०१ १७२२) (०२ मजुरी)

२. या प्रकरणी जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, जि.अहमदनगर यांना आहरण व संवितरणाचे अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

३. हे आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २७३०/२०१६/व्यय-१, दिनांक ८.१२.२०१६ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०७१५४९०५९७०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=AGRICULTURE AND ADF DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c08eef62183520696d2005b153b8cc2a552337a23fc4d457a4434216d9324c3b, serialNumber=6fd0ddfb9412fda09432e5f8a3e140c065770ba4ca63ef6fc5ba354810e2828b, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2017.03.07 15:50:39 +05'30'

(क.य.वंजारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. विभागीय, कृषि सह संचालक, पुणे / नाशिक.
३. जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, अहमदनगर.
४. महालेखापाल महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर.
५. निवासी लेखा अधिकारी, अधिदान व लेखा अधिकारी मुंबई.
६. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / पुणे.
७. प्रशासन अधिकारी, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८. वित्त विभाग (व्यय-१) , मंत्रालय, मुंबई.
९. कार्यासन (२-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती (कार्यासन १३-अे) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.